केंद्र शासनाच्या ' डेडीकेटेड फ्रेट कॉरीडॉर (DFC) ' प्रकल्पासाठीच्या महाराष्ट्रातील भू-संपादनास गती देण्यासाठी समिती गठीत करण्याबाबत.

---

महाराष्ट्र शासन
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - संकीर्ण ११११/ प्र.क्र.४०३/ बंदरे.१,**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२**
**दि. ८ डिसेंबर, २०११**

मुंबई व जेएनपीटी बंदरांतून इतरत्र होणाऱ्या मालवाहतूकीस (Evacuation of containers/ cargo) गती देण्याच्या प्रयोजनार्थ केंद्र शासनाकडून प्रस्तावित असलेल्या डेडीकेटेड फ्रेट कॉरीडॉर (DFC) या प्रकल्पाचा नियोजित विस्तार महाराष्ट्रातील रायगड जिल्ह्यातील जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट (JNPT) ते नॅशनल कॅपिटल रिजन (नवी दिल्ली) असा आहे. या प्रकल्पासाठीच्या महाराष्ट्रातील भू-संपादनास विलंब होत असल्याचे कारण नमूद करून प्रकल्पाचा जेएनपीटी ते वडोदरा हा भाग टप्पा-२ (PHASE-2) म्हणून हाती घेण्याचे प्रस्तावित केले जात आहे. परंतु या निर्णयामुळे सदर प्रकल्पाचे वर नमूद प्रयोजनच मोडीत निघते. त्यामुळे प्रकल्पासाठीच्या महाराष्ट्रातील भू-संपादनास होणारा विलंब टाळून भू-संपादनास गती देणे गरजेचे आहे.

**शासन निर्णय** :- डेडीकेटेड फ्रेट कॉरीडॉर (DFC) या केंद्र शासनाच्या प्रकल्पासाठीच्या महाराष्ट्रातील भू-संपादनास गती देण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

| | | |
|---|---|---|
| मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन | - | अध्यक्ष |
| प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग | - | सदस्य |
| प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग | - | निमंत्रक |
| विभागीय आयुक्त, कोकण विभाग | - | सदस्य |
| जिल्हाधिकारी, ठाणे | - | सदस्य |
| जिल्हाधिकारी, रायगड | - | सदस्य |
| व्यवस्थापकीय संचालक, डेडीकेटेड फ्रेट कॉरीडॉर कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लिमिटेड, नवी दिल्ली | - | सदस्य |
| अध्यक्ष, जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट, मुंबई | - | सदस्य |

२. सदर समितीकडून या प्रकल्पासाठीच्या महाराष्ट्रातील भू-संपादनाच्या कामाचा वेळोवेळी आढावा घेण्यात येईल. त्याआधारे संबंधित यंत्रणांकडून वेळोवेळी आवश्यक असलेल्या कार्यवाहीस गती देण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय हा महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर (वेबसाईट) उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०१११२०८१०२९३९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( अं. शा. घार्गे )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा.मंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (बंदरे) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, जुने सचिवालय आवार, मुंबई
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, इंडियन मर्कन्टाईल चेंबर्स, ३ रा मजला, रामजीभाई कमानी मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई - ४०० ००१
अध्यक्ष, जवाहरलाल नेहरू पोर्ट ट्रस्ट, ११०७, रहेजा सेंटर, २१४, फ्रि प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई - ४०० ०२१
जिल्हाधिकारी, ठाणे
जिल्हाधिकारी, रायगड, अलिबाग, जि. रायगड
सहसचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, डेडीकेटेड फ्रेट कॉरीडॉर कॉर्पो.ऑफ इंडिया लि., ५ वा मजला, प्रगती मैदान, मेट्रो स्टेशन बिल्डिंग कॉम्प्लेक्स, नवी दिल्ली - ११० ००१
निवडनस्ती (बंदरे.१)

E:\111dedicated freight corridor- note.lwp